राज्यातील शासकीय जिल्हा परिषद, पंचायत समित्या मधील वर्ग-३ व वर्ग-४ ची पदे भरण्यावरील स्थगिती उठविणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक:एसआरव्ही-२००३/प्र.क्र.३/०३/१२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ ऑगस्ट, २००४.

वाचा :- १.शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२००३/ प्र.क्र.३/०३/१२, दिनांक १० मार्च,२००३.
२. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२००३/ प्र.क्र.३/०३/१२, दिनांक १ ऑगस्ट, २००३.
३. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२००३/ प्र.क्र.३/०३/१२, दिनांक ३० ऑक्टोबर, २००३.
४. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२००३/ प्र.क्र.३/०३/१२, दिनांक २ डिसेंबर, २००३.
५. शासन निर्णय, नियोजन विभाग, क्रमांक : हसका-१३०१/प्र.क्र.१०७/ रोहयो-३, दिनांक २५ जून, २००४.

## परिपत्रक

रोजगार हमी योजनेतील हजेरी सहाय्यक, सर्वश्री शेख मुबारक आणि श्री.हौशिराम डांगे यांनी मुंबई उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठामध्ये दाखल केलेल्या याचिका क्रमांक:४/२००० आणि ८३/२००३ चे संदर्भात मा.उच्च न्यायालयाने दि.२८/२/२००३ रोजी दिलेल्या निर्णयानुसार रोजगार हमी योजनेतील सर्व हजेरी सहाय्यकांचे नियोजन विभागाच्या शासन निर्णय, क्र.हसका-१३९४/ प्र.क्र.१८५/रोहयो-३, दि.१/१२/१९९५ च्या आदेशानुसार शासन/जिल्हा परिषद,पंचायत समित्यांच्या सेवेमधील वर्ग-३ व वर्ग-४ पदावर समावेशन पूर्ण होईपर्यन्त राज्यातील केवळ सर्व शासकीय/जिल्हा परिषदा आणि पंचायत समित्यातील वर्ग-३ व वर्ग-४ ची पदे (तांत्रिक व शिक्षण सेवक/सहायक शिक्षक ही पदे वगळून) भरण्यावर स्थगिती देण्याचे आदेश संदर्भाधीन क्रमांक १ येथील दि.१० मार्च,२००३ अन्वये देण्यात आले होते.

२. संदर्भाधीन क्रमांक २, ३ व ४ येथील अनुक्रमे दिनांक १.८.२००३, ३०.१०.२००३ व २.१२.२००३ च्या परिपत्रकान्वये मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठाने दिलेल्या अनुमतीनुसार वर्ग-३ व वर्ग-४ मधील मागासवर्गीयांसाठी आरक्षित असलेली अनुशेषाची पदे भरण्यास परवानगी देण्यात आली होती.

३. संदर्भाधीन क्रमांक ५ येथील नियोजन विभागाच्या दि.२५.६.२००४ च्या आदेशान्वये अधिसंख्य पदे निर्माण करुन खुल्या प्रवर्गातील सर्व हजेरी सहायकांचे समावेशन पूर्ण केले. या पार्श्वभूमिवर राज्य शासनाने वर्ग-३ व वर्ग-४ मधील पदे भरण्यावरील निर्बंध उठविण्याकरीता मा.उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठामध्ये सिव्हील ॲप्लीकेशन क्र: ५६८१/२००४ दाखल केला होता. सदर अर्जावर

कृ.मा.प.....

दि.२४ ऑगस्ट, २००४ रोजी अंतिम सुनावणी होऊन वर्ग-३ व वर्ग-४ ची पदे भरण्यावरील निर्बंध पुर्णत: उठविण्याचे आदेश मा.उच्च न्यायालयाने पारीत केले आहेत. सबब, शासनाने वर नमूद केलेल्या क्रमांक ३ येथील दि.१० मार्च, २००३ च्या आदेशान्वये राज्यातील शासकीय, जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांमधील वर्ग-३ व वर्ग-४ ची पदे भरण्यावरील लागू केलेली स्थगिती आता पूर्णत: उठविण्यात येत आहे.

४. वर्ग-३ व वर्ग-४ मधील सर्व प्रवर्गातील पदे भरण्यावरील स्थगिती आता उठविण्यात आली असल्याने सदर पदे स्थगिती आदेश लागू करण्यापूर्वी (म्हणजे दिनांक १०/३/२००३ पूर्वी ) ज्या विहित मार्गाने व कार्यपध्दतीने भरण्यात येत होती त्याप्रमाणेच यापुढे भरण्यात यावीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(चारुशीला सोहोनी)
प्रधान सचिव (सेवा)

प्रति,
राज्यपालांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
सर्व मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
* प्रबंधक,मूळ शाखा,उच्च न्यायालय,मुंबई ,
* प्रबंधक,अपील शाखा,उच्च न्यायालय,मुंबई,
* प्रबंधक,लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई ,
* सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद) मुंबई,
* राज्य निवडणूक आयुक्त,राज्य निवडणूक आयोग,नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
* महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र, मुंबई,
* महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
* महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र, नागपूर,
* महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व परीक्षा),महाराष्ट्र, नागपूर,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई, (२ प्रती प्रसिध्दीकरिता)
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे) कोकण भवन,नवी मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
निरनिराळ्या मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवडनस्ती,
*पत्राने.

म-621 (5000-8-04)13